**मुंबई महानगरपालिकेच्या प्रमुख रुग्णालये व सार्वजनिक आरोग्य खाते यांच्या आस्थापनेवरील "रक्त संक्रमण अधिकारी" या पदांच्या सुधारित अर्हतांना शासनाच्या मान्यतेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- बीएमसी-२५१६/प्र.क्र.६१८/नवि-२१**

**मंत्रालय, मुंबई :- ४०० ०३२.**

**दिनांक :- ०६ फेब्रुवारी, २०१९**

वाचा :-

१. अतिरिक्त आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई यांचे पत्र क्रमांक केईएम/१८५७४/जी-१, दिनांक २८ मार्च, २०१६.

२. संचालक (वै.शि.व प्र.रु.) व अधिष्ठाता (रा.ए.स्मा. रुग्णालय) यांचे दिनांक ०६ जून, २०१८ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

बृहन्मुंबई महानगरपालिकेच्या प्रमुख रुग्णालये व महानगरपालिकेच्या सार्वजनिक आरोग्य खात्याच्या अखत्यारीतील रक्त संक्रमण विभागामार्फत, रुग्णालयातील दाखल रुग्ण व इतर रुग्ण यांना रक्त पुरवठा करण्याचे काम करण्यात येते. सदर विभागाकरीता अन्न व औषध प्रशासनाच्या निकषांनुसार "रक्त संक्रमण अधिकारी" या संवर्गातील पदाची आवश्यकता आहे.

बृहन्मुंबई महानगरपालिकेने दिनांक ११ नोव्हेंबर, २००४ अन्वये रक्त संक्रमण अधिकारी या संवर्गातील पदे निर्माण केली असून सदर पदांच्या अर्हतांना दिनांक ०६ जानेवारी, २००५ अन्वये मान्यता दिलेली आहे. सदर अर्हतांमध्ये संगणक ज्ञान व मराठी भाषेचे ज्ञान या अर्हतांचा नव्याने समावेश करण्यात आला असून ६ व्या वेतन आयोगानुसार या पदाची वेतन श्रेणी रुपये १५,६००-३९,१०० + ग्रे.पे. ६,००० अशी सुधारीत झाली आहे. सदर पदाच्या सुधारित अर्हतांना शासन मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मुंबई महानगरपालिकेच्या प्रमुख रुग्णालये व सार्वजनिक आरोग्य खाते यांच्या आस्थापनेवरील "रक्त संक्रमण अधिकारी" या पदांच्या सुधारित अर्हतांना सोबत जोडलेल्या विवरणपत्र "अ" प्रमाणे बृहन्मुंबई महानगरपालिका अधिनियम, १८८८ च्या कलम ८० (ब) (४) मधील तरतूदीनुसार मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०७१६२६१४८९२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्रचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Veena Baburao More

Digitally signed by Veena Baburao More
DN: CN = Veena Baburao More, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Urban Development Department
Date: 2019.02.07 16:36:35 +05'30'

**(वीणा मोरे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. महापौर, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.
२. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई.

**प्रत,**

१. मा. राज्यपाल महोदयांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अप्पर मुख्य सचिव
३. मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव
४. प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहाय्यक
५. निवडनस्ती (नवि-२१)

## (शासन निर्णय नगर विकास विभाग क्रमांक बीएमसी-२५१६/प्र.क्र.६१८/नवि-२१,

## दिनांक ०६ फेब्रुवारी, २०१९ चे विवरणपत्र “अ”)

## “मुंबई महानगरपालिकेच्या प्रमुख रुग्णालये व सार्वजनिक आरोग्य खाते यांच्या आस्थापनेवरील रक्तसंक्रमण अधिकारी या पदांच्या सुधारित अर्हता”

०१. उमेदवार मेडिसीन - एम.डी. (पॅथोलॉजी / ट्रान्स्फ्युजन मेडिसीन) मध्ये पदव्युत्तर पदवीधारक (Postgraduate degree in medicine - M.D. (Pathology / Transfusion Medicines) असावा.

अथवा

उमेदवार मेडिसीन मधील पदवी (एम.बी.बी.एस.) व पॅथॊजीमधील पदविका (Degree in Medicine (MBBS) with Diploma in Pathology) धारक असावा किंवा ट्रान्सफ्युजन मेडिसीनमधील पदविकेसह मेडिसीन मधील पदवी (एम.बी.बी.एस.) व ट्रान्सफ्युजन मेडिसीनमधील, तसेच रक्तगट सेरॉलॉजी, रक्तगट मेथडॉलॉजी आणि वैद्यकीय तत्वे त्यासंबंधातील घटक तयार करण्यासंबंधी किमान १ वर्षाचा अनुभव असावा. (Transfusion Medicine having adequate knowledge in Blood group serology, Blood group Methodology and Medical Principals involved in procurement of blood and/or preparation of it components.)

किंवा

नियमित सेवाकाळात एक वर्षासाठी रक्तपेढीतील अनुभावासह मेडिसीनमधील पदवी (एम.बी.बी.एस.) आणि त्याबरोबर रक्तगट सेरॉलॉजी, रक्तगट मेथडॉलॉजी आणि पुरवठ्यातील वैद्यकीय तत्वे आणि अथवा त्यासाठीचे घटक तयार करण्यासंबंधी १ वर्षाचा अनुभव असावा. (Degree in Medicine (MBBS) having experience in Blood Bank for १ Year during regular service and also has adequate knowledge and experience blood group serology, blood group methodology and medical principles involved in a procurement of blood and/or preparation of its components) असावा. (पदवी अथवा पदविका केंद्र सरकारद्वारा मान्यता प्राप्त विद्यापीठाकडील असावी.)

०२. उमेदवारांना संगणकाचे ज्ञान असणे आवश्यक आहे. त्याने/तिने (डी.डी.ओ.ई.ए.सी.सी.) सोसायटीचे (सी.सी.सी.) किंवा (ओ स्तर) किंवा (ए स्तर) किंवा (बी स्तर) किंवा (सी स्तर) स्तरावरील प्रमाणपत्र किंवा महाराष्ट्र राज्य आणि तांत्रिकी शिक्षण मंडळाचे एम.एस.सी.-आय.टी. किंवा जी.ई.सी.टी. चे प्रमाणपत्र धारण करणे आवश्यक आहे किंवा सदर प्रमाणपत्र सादर करण्यास सूट देण्याकरिता उमेदवाराने शासनाने वेळोवेळी संगणक हाताळणी/वापराबाबत मान्यता दिलेला अभ्यासक्रम पूर्ण केलेला असावा. तथापी, नियुक्तीच्या वेळी उमेदवाराजवळ सदर प्रमाणपत्र नसल्यास त्याने/तिने शासनाने विहीत केलेली एम.एस.सी.-आय.टी. ची परीक्षा नेमणूकीच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. अन्यथा त्याची सेवा समाप्त करण्यात येईल.

०३. उमेदवार माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षेत किंवा तत्सम किंवा उच्चतम परीक्षा किमान ५० गुणांचा मराठी विषय घेऊन उत्तीर्ण असावा. तथापि, मराठी मातृभाषा असलेल्या पण माध्यमिक शालांत प्रमाणपत्र परीक्षेत मराठी विषय घेतलेले नसलेल्या उमेदवारांची त्यांनी महानगरपालिकेमार्फत घेण्यात येणारी मराठी भाषेची परीक्षा नियुक्तीपासून ३ वर्षाच्या आत उत्तीर्ण होण्यासापेक्ष नेमणूक करण्यात येईल. महानगरपालिकेमार्फत घेण्यात येणारी मराठी भाषेची परीक्षा ३ वर्षाच्या आत उत्तीर्ण न झाल्यास त्यांची नियुक्ती समाप्त करण्यात येईल. त्यांना कोणत्याही परिस्थितीत मराठी भाषेची परीक्षा उत्तीर्ण होण्यासाठी मुदतवाढ दिली जाणार नाही.

Veena Baburao More

Digitally signed by Veena Baburao More
DN: CN = Veena Baburao More, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Urban Development Department
Date: 2019.02.07 16:36:59 +05'30'

**(वीणा मोरे)**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**